मागासवर्गीय सहकारी सूतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज वितरीत करण्याबाबत...
सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सूतगिरण्यांना कर्ज मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सुतगि-२०२५/प्र.क्र. ८९ /अजाक**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ मार्च, २०२५.

वाचा: १. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग - एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो-२ दिनांक ३०.०३.२०००.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-सुतगि-२००३/५५५/प्र.क्र.३३/विघयो-२ दिनांक ०२.०७.२००४.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - १११६/प्र.क्र. २४ टेस्क-१ (अ), दिनांक २३.०३.२०१६.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - ११६/ प्र.क्र.२४/ टेक्स -१(अ), दिनांक ३१.०३.२०१८.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - १११६/ प्र.क्र.२४/ टेक्स -१ (अ), दिनांक २९.०८.२०१९.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - १११६/ प्र.क्र.२४/ टेक्स -१(ब), दिनांक ३१.०३.२०२४.
७. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सुतगि-२०१९/प्र.क्र. २४५/ अजाक, दिनांक २५ मार्च, २०२२
८. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. सकआ/अजाउयो/ औसंसु/ गोविंद सुत. बीड/का-१४/२०२४-२५/३१०, दिनांक १० मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यात १२व्या पंचवार्षिक योजना काळात स्थापन झालेल्या व शासनाच्या सहकार व वस्त्रोद्योग विभागाने पुरस्कृत केलेल्या सहकार क्षेत्रातील मागासवर्गीय (अनुसूचित जाती) सूतगिरण्यांना तदर्थ पद्धतीने दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येते. यासाठी शासनाने संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २००० व दिनांक ०२ जुलै, २००४ च्या शासन निर्णयान्वये सुधारित अटी व शर्ती निश्चित केलेल्या आहेत. याशिवाय सूतगिरणीतील ७०% सभासद हे अनुसूचित जातीतील असणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज या योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी रुपये ७०.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे.

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय सहाय्य या योजनेअंतर्गत गोविंद मागासवर्गीय सहकारी सुतगिरणी मर्या., माजलगाव, जि. बीड या सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु. ७३,२४,६५,०००/- इतकी आहे. सदर सुतगिरणी ही मागासवर्गीय प्रवर्गातील असल्याने सामाजिक न्याय विभागाच्या

योजनेनुसार एकूण प्रकल्प किंमतीच्या ५:४५:५० या अर्थसहाय्याच्या सुत्रानुसार रु. ३६,६२,३२,०००/- इतके दीर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. या विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार स्वत:चे व शासकीय भागभांडवल जेवढे उभारले जाईल त्याच्या १:१ प्रमाणात दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येते. प्रस्तुत सुतगिरणीला सहकार व वस्त्रोद्योग विभागाने संदर्भ क्र. ३ ते ६ अन्वये एकूण रुपये ३२,९६,०९,०००/- भागभांडवल मंजूर केलेले आहे. तसेच सदर सुतगिरणीचा स्वहिसा रुपये ३,६६,६०,०००/- इतका आहे. त्यास अनुसरुन सदर सूतगिरणीस रुपये ३६,६२,३२,०००/- दीर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. संदर्भ क्र. ७ अन्वये सदर सुतगिरणीस रुपये १९,१६,००,०००/- इतके दीर्घ मुदतीचे कर्ज मंजुर झाले असुन त्याअनुषंगाने, गोविंद मागासवर्गीय सहकारी सुतगिरणी मर्या., माजलगाव, जि. बीड या सूतगिरणीस उर्वरीत दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

गोविंद मागासवर्गीय सहकारी सुतगिरणी मर्या., माजलगाव, जि. बीड या सूतगिरणीस रुपये १७,४६,३२,०००/- एवढे दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, देयकावर प्रती स्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास देण्यात येत आहेत.

३. उपरोक्त निधी आहरीत केल्यानंतर आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी त्यांचे अधिनस्त ठेवावा.

४. या बाबीवर होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक एन - ४
६२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांच्या कल्याणासाठी कर्जे
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
८००- इतर कर्जे,
(०१) अनुसूचित जातींना कर्जे,
(०१) (०१) अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना कर्जे (कार्यक्रम)
(६२२५ ०२२ २), ५५ कर्जे व आगाऊ रकमा

५. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील. विहित अटी व शर्तीची पुर्तता झाल्यानंतरच आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी निधी वितरीत करण्यात यावा.

६. वित्त विभागाकडून सदर योजनेकरिता ज्याप्रमाणे निधी उपलब्ध होईल त्याप्रमाणे मंजूर निधीचे वितरण करण्यात येईल.

७. सदर संस्थेस कर्जाचा हप्ता यापूर्वी दिला नाही याची खातरजमा आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागास उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या मर्यादेत व प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२५१२२७५६९०२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2025.03.25 12:28:33 +05'30'

**(प्रविण शिशुपाल)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई
२. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड/पुणे,
७. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, बीड,
८. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, छत्रपती संभाजीनगर.
९. सहायक आयुक्त, समाज कल्याण, बीड,
१०. वित्त विभाग (अर्थोपाय/अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई,
११. अध्यक्ष /कार्यकारी संचालक, गोविंद मागासवर्गीय सहकारी सुतगिरणी मर्या., माजलगाव, जि. बीड
१२. निवडनस्ती ( अजाक ).